


वाचन पातळी २

# बुजगावण्यांची वरात

**Author:** Shamim Padamsee
**Illustrator:** Tanaya Vyas
**Translator:** Varsha Gajendragadkar



“ए आई, मी पण करू का गं तुला मदत बुजगावणं करण्यासाठी?” गौरीनं विचारलं.
बुजगावणं तयार करण्यासाठी आई काटक्या एकत्र बांधत होती. मग तिनं एक जुना शर्ट त्या काटक्यांवर टाकला आणि त्यात गवताचा पेंढा भरला.



पलीकडे दोरीवर धुतलेले कपडे वाळत घातले होते. गौरी तिकडे धावत गेली. तिनं त्यातला एक फ्रॉक ओढून घेतला. “आई गं, माझा हा नवा लाल फ्रॉक मी हिला घालणार हं आता आणि लाल रिबीन लावून तिचे केससुद्धा मस्त बांधणार! किती छान दिसेल ना गं ही?”



"अगं वेडाबाई, बुजगावणं कधी छान असतं का? बुजगावणं असतं ते पक्ष्यांना घाबरवण्यासाठी. मग ते भीतिदायक नको का दिसायला? हे बघ असं!" तोंड आणि हात वेडेवाकडे फिरवत आई म्हणाली.

गौरी खिदळली. "तू किती मज्जेशीर दिसतेस, आई!"



आईनं सगळी बुजगावणी शेतात नेली आणि कणसांनी भरलेल्या उंच पिकांमध्ये ती उभी केली. “बुजगावण्यांनो, आता अगदी शहाण्यासारखं वागायचं आणि पक्ष्यांना हाकलून लावायचं,” गौरी त्यांना लाडानं थोपटत म्हणाली.



गौरी आणि तिची आई त्यांच्या शेतावरच्या घरात परत आल्या. गौरी आतल्या खोलीत गेली आणि आपल्या पलंगावर पडली. तजेलदार बदामी रंगाचा मोठ्ठा चंद्र आकाशात वर येत होता. त्याच्या उजळ, पांढऱ्या प्रकाशात शेत न्हाऊन निघालं होतं.



गौरीनं खिडकीतून पाहिलं तर एक बुजगावणं खाली वाकून स्वत:च्या कपड्यांकडे बघत होतं.
"असले फाटके, जुने कपडेच आमच्या वाट्याला का येतात कोण जाणे?" ते बुजगावणं सुस्कारा सोडत म्हणालं. "कधीतरी सुंदर नवे कपडे घालायला मिळाले तर?"

"हो रे! मलाही तसंच वाटतंय!" दुसरं बुजगावणं म्हणालं. बुजगावण्यांनी शेतात इकडे तिकडे नजर टाकली. अचानक त्यांच्यापैकी एकजण मोठ्यानं ओरडला, "अरे, तिकडे बघा. त्या दोरीवरचे कितीतरी सुंदर कपडे वाऱ्यावर फडफडतायत. आपण घालू या का ते?"

"वा! केवढे मस्त आहेत रे हे कपडे! चला घालून तर पाहूया." दुसरं बुजगावणं म्हणालं.



चमचमत्या टिकल्या लावलेला लाल ड्रेस एका बुजगावण्यानं घातला. चंद्रप्रकाशात टिकल्या लकाकत होत्या. वाऱ्याबरोबर झुलणाऱ्या लाल रिबिनीही त्यानं आपल्या गवताच्या केसांना बांधल्या. नव्या ड्रेसमुळे खूश झालेलं बुजगावणं गिरक्या घेत नाचायला लागलं.

मग सगळीच बुजगावणी नवे कपडे चढवण्यात दंग झाली. नव्या कपड्यात स्वत:ला बघताना त्यांना इतका आनंद झाला की त्यांना राहवेना. कुणी उड्या मारायला लागलं, कुणी ऐटीत चालत निघालं, कुणी मुरडत, लचकत पावलं टाकत निघालं, कुणी गिरक्या घेत राहिलं. वरातच निघाली त्यांची!

आपली रिकाम्या मडक्यांची डोकी उडवत दात वेंगाडत ती खदखदून हसत होती.

खूपच धमाल चालली होती त्यांची!



त्याच वेळी शेकडो पक्षी शेतावर झेपावले. इथे-तिथे, इकडे-तिकडे, पक्षीच पक्षी!
कणसांमध्ये घुसणाऱ्या चोची, दाणे कुरुकुरु चावणाऱ्या चोची, दाणे गट्टम करणाऱ्या चोची!
“आहा! काय चवदार आहे!” एक पक्षी चोच साफ करत म्हणाला. “शेतातला खाऊ असा रोज रोज खाता येत नाही. ती बुजगावणी असतात ना आपल्याला हाकलायला!”



बुजगावण्यांनी हे ऐकलं आणि इकडेतिकडे पाहिलं. ती सगळी घाबरलीच.
“शू ए चला, पळा!” ती पक्ष्यांच्या दिशेनं आपले गवताचे हात मागे-पुढे हलवत ओरडली.



गौरीही जोरात किंचाळली. तिची आई आवाज ऐकून धावत आली, “गौरी, अगं काय झालं? जागी हो, गौरी!” “आई, अगं पक्षी! ते आपलं शेत फस्त करतायत! आईनं गौरीला घट्ट जवळ घेतलं आणि म्हणाली, “बाळा, शांत हो पाहू! शेताकडे बघ. अगदी सुरक्षित आहे आपल शेत. तुला भीतीदायक स्वप्न पडलं असणार!”



गौरीनं बाहेर बघितलं. तिला बुजगावणी दिसली.
आईनं उभ्या केलेल्या जागीच ती उभी होती.





अरेच्चा! बुजगावणी तिच्याकडे बघून हात तर हलवत नव्हती?
गौरीनं नीट निरखून पाहिलं. एका बुजगावण्याच्या केसांवर लाल रिबीन फडफडत होती.
तिनं डोळ्यांची उघडझाप केली आणि पुन्हा पाहिलं - ते बुजगावणं तिच्याकडेच बघत डोळे मिचकावत तर नव्हतं!

PRATHAM BOOKS storyweaver



## Story Attribution:

This story: बुजगावण्यांची वरात is translated by Varsha Gajendragadkar . The © for this translation lies with Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Based on Original story: 'The Scarecrows on Parade', by Shamim Padamsee . © Pratham Books , 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

## Other Credits:

This book has been published on StoryWeaver by Pratham Books.The development of the print version of this book has been supported by HDFC Asset Management Company Limited (A joint venture with Standard Life Investments). www.prathambooks.org

## Illustration Attributions:

Cover page: Girl and scarecrow, by Tanaya Vyas © Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 2: Girl talking to lady, by Tanaya Vyas © Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 3: Girl looking at dress near clothesline, by Tanaya Vyas © Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 4: Girl laughing at lady making faces, by Tanaya Vyas © Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 5: Girl and lady making a scarecrow, by Tanaya Vyas © Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 6: Girl looking at scarecrows in a field by Tanaya Vyas © Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 7: Girl looking at scarecrows through a window, by Tanaya Vyas © Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 8: Scarecrow wearing a red dress, by Tanaya Vyas © Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 9: Scarecrows dancing, by Tanaya Vyas © Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 10: Birds eating, by Tanaya Vyas © Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

Illustration Attributions:

Page 11: Scarecrows looking at birds, by Tanaya Vyas © Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 12: Birds on a cot, by Tanaya Vyas © Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 13: Mother and daughter, by Tanaya Vyas © Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 14: Scarecrow winking at girl, by Tanaya Vyas © Pratham Books, 2014. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.





# बुजगावण्यांची वरात
(Marathi)

पक्षी आणि प्राण्यांनी शेतात घुसू नये म्हणून त्यांना घाबरवण्यासाठी शेतात बुजगावणी उभारतात. पण छोट्या गौरीला मात्र काही वेगळंच वाटतं!

या पुस्तकाची वाचन पातळी २ आहे. ओळखीचे शब्द जाणून वाचणाऱ्या आणि मदत घेऊन नवे शब्द वाचू शकणाऱ्या मुलांसाठी.




Pratham Books goes digital to weave a whole new chapter in the realm of multilingual children's stories. Knitting together children, authors, illustrators and publishers. Folding in teachers, and translators. To create a rich fabric of openly licensed multilingual stories for the children of India  and the world. Our unique online platform, StoryWeaver, is a playground where children, parents, teachers and librarians can get creative. Come, start weaving today, and help us get a book in every child's hand!